**सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी महिला आर्थिक विकास महामंडळास निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-माविम-२०२०/प्र.क्र.२६/का-१०**
नविन प्रशासन भवन, तिसरा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- १४ जुलै, २०२०.

वाचा :-

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०.
२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.४ मे, २०२०.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि.१६.४.२०२० रोजीच्या परिपत्रकानुसार मागणी क्र.एक्स-०१ याखाली विभागास उपलब्ध करण्यात आलेले "महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२०" विचारात घेता, महिला आर्थिक विकास महामंडळातील नियमित अधिकारी/ कर्मचारी यांचे वेतन व करार तत्वावरील अधिकारी / कर्मचारी यांचे मानधन तसेच व्यवस्थापन खर्चासाठी मागणी क्र.एक्स-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण १०३, महिला कल्याण, (०३) इतर योजना, (०३) (०१) महिला आर्थिक विकास महामंडळ (महिला सक्षमीकरण), (कार्यक्रम), (२२३५ १३१६) या लेखाशीर्षाखाली ३६ सहायक अनुदाने (वेतन) या उद्दिष्टाकरिता सन २०२०-२१ या अर्थसंकल्पीय वर्षाकरिता अर्थसंकल्पीत ₹२४,४५,१६,०००/- निधीमधून **₹४,९८,९२,०००/- (अक्षरी रुपये चार कोटी अठ्यान्नव लक्ष ब्यान्नव हजार फक्त)** इतका निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यासाठी जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणाऱ्या निधीमधून महिला आर्थिक विकास महामंडळाच्या वेतनेत्तर बाबींवर निधी खर्च करण्यापूर्वी त्यास शासनाची मान्यता घेण्यात यावी. तसेच यापुढे सदर प्रयोजनासाठी निधीची मागणी करण्याच्या प्रस्तावासह वेतन व वेतनेत्तर बाबींवरील खर्चाची बाबनिहाय माहिती शासनास सादर करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा, मुंबई यांनी घ्यावी.

५. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांच्या सहीने तयार केलेले व उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांनी प्रतिस्वाक्षरी केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी यांना सादर करावे. अधिदान व लेखा अधिकारी यांनी सदर देयकातील मंजूर रक्कम धनादेशाव्दारे अदा करावी. उपसचिव, महिला व बाल विकास विभाग यांना जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर यांनी सादर केलेल्या देयकावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार दिलेले आहेत.

६. हा शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.५९४/व्यय-६, दि.६.७.२०२० अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००७१४१३४५१४०४३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVINDRA SITARAM JARANDE

Digitally signed by RAVINDRA SITARAM JARANDE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=186d0f0fdd27c79b9b3f859a90ec537946c37d5876e64ce525d082e58e494c85, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBA, serialNumber=4d2dc3dbd5c0f35a66a84c93b4cead367c64cc2bc9d7391e9a053988a2f81b64, ou=WOMEN AND CHILD DEVLOPMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAVINDRA SITARAM JARANDE
Date: 2020.07.14 16:12:37 +05'30'

**(र.सि.जरांडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
३. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
४. महालेखापाल- महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
७. जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, मुंबई उपनगर
८. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवड नस्ती, का-१०.